**खाजगी दूरदर्शन वाहिन्यांकरिता राज्यस्तरीय सनियंत्रण समिती स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्र.:-सीटीएन-२००८/प्र.क्र.२९/३४**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक :- १६ डिसेंबर, २००९**

वाचा :- १) भारत सरकार माहिती प्रसारण मंत्रालय,आदेश क्र.२३०१/७/२००३/ बीसी-तीन, दि.६.९.२००५

२) भारत सरकार माहिती प्रसारण मंत्रालय,आदेश क्र.एफ-१२०३/१/ २००७/बीसी-दोन, दि.१९.२.२००८

३) भारत सरकार माहिती प्रसारण मंत्रालय,आदेश क्र.एफ-३१०२/१/२००८/ बीसी-दोन, दि.२८.७.२००८

**शासन निर्णय :-**

खाजगी दूरदर्शन वाहिन्यांकरिता राज्यस्तरीय संनियंत्रण समिती स्थापन करण्याचे आदेश केंद्र शासनाच्या वर नमूद केलेल्या आदेशाव्दारे देण्यात आलेले आहेत. तसेच केंद्र शासनाच्या वर नमूद केलेल्या दि.१९.२.२००८ व दि.२८.७.२००८ च्या आदेशाव्दारे राज्यस्तरीय समितीची रचना निश्चित करून दिलेली आहे. केंद्र शासनाच्या सदर आदेशांच्या अनुषंगाने खाजगी दूरदर्शन वाहिन्यांकरिता खालीलप्रमाणे राज्यस्तरीय सनियंत्रण समिती स्थापन करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

**शासकीय सदस्य :-**

| | | |
|---|---|---|
| १) सचिव, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र शासन, | - | अध्यक्ष |
| २) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र शासन यांचे प्रतिनिधी, | - | सदस्य |
| ३) सचिव, सामाजिक न्याय, महाराष्ट्र शासन, | - | सदस्य |
| ४) सचिव, महिला व बालविकास, महाराष्ट्र शासन, | - | सदस्य |
| ५) संचालक, दूरदर्शन केंद्र, मुंबई, | - | सदस्य |
| ६) संचालक (माहिती) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय मुंबई | - | सदस्य सचिव |

समितीवरील अशासकीय सदस्यांची नियुक्ती स्वतंत्रपणे करण्यात येईल.

२. राज्यस्तरीय सनियंत्रण समितीची कार्ये खालीलप्रमाणे राहतील :-

१) जिल्हा/स्थानिक समिती स्थापन करण्यात आली आहे का ते पहाणे

२) त्यांच्या बैठका नियमित होतात का ते पहाणे,

३) प्रधिकृत अधिकारी त्यांच्या सेवा परिणामकारकतेने बजावीत आहेत का ते पहाणे,

४) त्यांच्याव्दारा किती प्रकरणे निकाली काढली आणि कोणते निर्णय घेण्यात आले ते पहाणे,

५) जिल्हा/स्थानिक पातळीवरील समित्यांना सूचना/मार्गदर्शन देणे,

६) जिल्हा/स्थानिक पातळीवरील समित्यांकडून आालेल्या प्रकरणावर निर्णय घेणे

७) जिल्हा/स्थानिक पातळीवरील समित्यांकडून आकडेवारी/माहिती एकत्र करून ती सचिव, माहिती आणि प्रसारण, मंत्रालय, भारत सरकार यांना पाठविणे

८) कार्यक्रम आणि जाहिरात संहितांच्या संदर्भात केंद्र शासनाच्या आदेशाचे उल्लंघन केल्यास या उपग्रह वाहिनी (राष्ट्रीय चॅनेल्स) विरूध्द कारवाई करण्यासाठी राज्याचे मुख्य सचिवांमार्फत, सचिव, माहिती आणि प्रसारण, मंत्रालय, भारत सरकार यांचेकडे त्याच्या विरूध्द कार्यवाही करण्यासाठी शिफारस करणे आणि तक्रारी पाठविणे.

**३.** समितीची वर्षातून कमीत कमी एक तरी बैठक होणे आवश्यक आहे. आवश्यकतेनुसार एकापेक्षा अधिक बैठका घेता येतील. समिती राज्यातील नोंदणीकृत केबल चालकांची जिल्हावार आकडेवारी तसेच राज्यातील अंदाजीत घरगुती टि.व्ही./दर्शकांच्यासंख्येसह दरवर्षी दिनांक ३१ डिसेंबरपूर्वी वार्षिक अहवाल माहिती व प्रसारण मंत्रालय, भारत सरकार यांना सादर करतील.

**४.** हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र.२००९१२१६१८०२०५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सही/-

**( तु. वि. लव्हटे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती,**

मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,

मा. उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,

मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव,

मा. राज्यमंत्री (मा. व ज.) यांचे खाजगी सचिव,
मा. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

मा. मुख्य सचिवांचे सहसचिव,
अपर मुख्य सचिव, गृह विभाग,
प्रधान सचिव (विशेष) गृह विभाग,
सचिव, सामाजिक न्याय,
सचिव, महिला व बालविकास,
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,
संचालक, दूरदर्शन केंद्र, मुंबई,
समितीचे सर्व सदस्य,
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई,
संचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हादंडाधिकारी,
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व पोलीस अधिक्षक,
सर्व उप जिल्हाधिकारी,
सर्व विभागीय माहिती अधिकारी,
सर्व जिल्हा माहिती अधिकारी,
वित्त विभाग, व्यय-४,
निवड नस्ती-कार्या. ३४.